**केंद्रिय कृषि मुल्य व किंमत आयोग, भारत सरकार, नवी दिल्ली यांनी आयोजित केलेल्या नवी दिल्ली येथील व आयोगाच्या महाराष्ट्र भेटी दरम्यान आयोजित बैठकांना उपस्थित राहण्यासाठी शेतकरी प्रतिनिधींना प्रवास व दैनिक भत्ता मंजूर करणेबाबत**

## महाराष्ट्र शासन

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र.शेमाभास-२००८/प्र.क्र.७०/शेतमाल भाव समिती कक्ष**
**मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक :- २० जुलै, २००९.**

संदर्भः- १) शा.नि.क्र.अेपीसी-११/२०००/सीआर १६८/११ अे, दि.२३ नोव्हेंबर, २०००
२) शा.नि.क्र.अेपीसी-१००५/प्र.क्र.४३/११ अे, दि.११ फेब्रुवारी, २००५
३) सदस्य सचिव, केंद्रिय कृषि मुल्य व किंमत आयोग, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे अ.शा.पत्र क्र.१-१/२००८- p &o - CACP दि.१९ मे, २००८

**प्रस्तावनाः-**

केंद्रिय कृषि मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचेकडून प्रत्येक वर्षी खरिप, रब्बी व ऊस हंगामासाठी किमान आधारभूत किंमती शेतकऱ्यांच्या सोयीसाठी जाहीर करण्यात येतात. याकरिता केंद्र शासनाने केंद्रिय कृषि मुल्य व किंमत आयोगाची स्थापना केली आहे. केंद्रिय कृषि मुल्य व किंमत आयोग संबंधीत सर्व राज्यांकडून प्रस्ताव प्राप्त करुन व नवी दिल्ली येथे संबंधीत राज्याचे विविध विभागाचे / कृषि विद्यापीठांचे प्रतिनिधी यांचे सोबत बैठक आयोजित करुन त्या आधारे कृषि मंत्रालयास सादर करावयाचे किमान आधारभूत किंमतीचे प्रस्ताव तयार करते. या बैठकांना अधिकाऱ्यांसोबतच शेतकऱ्यांच्या समस्यांची जाण असणाऱ्या किमान दोन शेतकऱ्यांना आयोगाच्या बैठकीस शेतकरी प्रतिनिधी म्हणून पाठविणेबाबत राज्य शासनास सुचित करते. आयोगाच्या नवी दिल्ली येथे वर्षातून खरिप, रब्बी व ऊस हंगामासाठी बैठका आयोजित करण्यात येतात. या व्यतिरिक्त प्रत्येक वर्षी केंद्रिय कृषि मुल्य व किंमत आयोग राज्यातील शेतीविषयक समस्या जाणून घेण्यासाठी राज्यांच्या भेटीचा दौरा आयोजित करते. वरील संदर्भ क्र.१ मधील शासन निर्णयान्वये आयोगाचे अध्यक्ष व पदाधिकारी यांना राज्य अतिथी दर्जा देण्यात आलेला आहे. आयोगाच्या राज्याच्या भेटीदरम्यान आयोजित बैठकांना सुध्दा किमान दोन शेतकरी प्रतिनिधींना आमंत्रित करण्यासाठी आयोगाकडून सुचित करण्यात येते. शेतकरी प्रतिनिधींना आयोगाच्या बैठकांना उपस्थित राहण्यासाठी प्रवास व दैनिक भत्ता आयोगाकडून बैठकीच्या वेळी परस्पर देण्याची व्यवस्था सन २००७ पर्यंत कार्यान्वित होती. सन २००८ पासुन शेतकरी प्रतिनिधींना प्रवास व दैनिक भत्ता राज्य शासनामार्फत द्यावयाचा आहे. शेतकऱ्यांच्या समस्या आयोगाच्या बैठकांमध्ये मांडण्यासाठी या बैठकांना शेतकरी प्रतिनिधींना पाठविणे अत्यंत गरजेचे आहे. शेतकरी प्रतिनिधींना आयोगाच्या बैठकांना नवी दिल्ली येथे उपस्थित राहण्यासाठी तसेच आयोगाच्या राज्याच्या दौऱ्याच्या वेळेस राज्य स्तरावर आयोजित बैठकांना उपस्थित राहण्यासाठी शेतकरी प्रतिनिधींना कोणत्या दराने प्रवास व दैनिक भत्ता देण्यात यावा हा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. या बाबत शासन पुढील प्रमाणे आदेश देत आहे.

**शासन निर्णय:-**

केंद्रिय कृषि मुल्य व किंमत आयोग, भारत सरकार, नवी दिल्ली यांनी आयोजित केलेल्या खरिप, रब्बी व ऊस हंगामाच्या नवी दिल्ली येथील बैठकांना उपस्थित राहण्यासाठी तसेच आयोगाच्या राज्याच्या भेटी दरम्यान राज्य स्तरावर आयोजित बैठकांना उपस्थित राहण्यासाठी दोन शेतकरी प्रतिनिधींना रेल्वेच्या प्रथम वर्गाने / वातानुकूलित तीन स्तर शयनयानाने / वातानुकूलित खुर्चीयानाने प्रवास करण्यास मान्यता देण्यात येत आहे. या वर्गाव्यतिरिक्त इतर वर्गाने वा इतर मार्गाने प्रवास केल्यास उदा.बस इ.चा प्रत्यक्ष खर्च किंवा रेल्वेच्या वर उल्लेख केलेल्या वर्गाच्या प्रवासाचा खर्च यापैकी जी रक्कम कमी असेल ती मिळण्यास पात्र राहतील, तसेच शासकीय विश्रामगृहात वास्तव्य केल्यास प्रति दिन २००/- रुपये व हॉटेलमध्ये वास्तव्य केल्यास प्रति दिन ३८०/- रुपये दराने दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील. दैनिक भत्त्याचे हे दर नवी दिल्ली येथील बैठकांसाठी असून, आयोगाने राज्यात मुंबई वा अन्यत्र बैठका घेतल्यास त्या त्या ठिकाणी लागू असलेल्या दराने दैनिक भत्ता अनुज्ञेय ठरेल.

यासाठी होणारा खर्च - मागणी क्र.डी-७, ३४५१, सेक्रेटरिएट-आर्थिक सेवा, (०९०)- सेक्रेटरिएट, ०९०(०१) (०१) कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, दत्तमत्त (३४५१ ०६७२), १३- कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्र.१९९/०९/सेवा-५, दि.१२.६.२००९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २००९०७२०१५४९५८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

(ब.दि.उमाटे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) कृषि आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) कुलसचिव, कृषि विद्यापीठे (सर्व)
३) नियंत्रक, कृषि विद्यापीठे (सर्व)
४) विभाग प्रमुख, कृषि अर्थशास्त्र विभाग (सर्व)
५) विभागीय कृषि सह संचालक (सर्व)
६) जिल्हाअधिक्षक, कृषि अधिकारी (सर्व)
७) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर
११) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर
१२) सहकार व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई (सेवा - ५)
१६) कृषि व पदुम विभागातील सर्व कार्यासने .१७) निवड नस्ती (कार्यासन ११ अे)